**यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या कार्यालयातील “प्रशासकीय अधिकारी (प्रशिक्षण व व्यवस्थापन) गट-अ,” या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत**
**श्री.प्रविण विलास शिशुपाल, कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र.कअनि-११२५/प्र.क्र.४२/प्रशा-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १७ जून, २०२५

**शासन आदेश**

श्री.प्रविण विलास शिशुपाल, कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांची सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त **यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे** या कार्यालयातील **“प्रशासकीय अधिकारी (प्रशिक्षण व व्यवस्थापन) गट-अ”** या पदावर प्रथमत: ०३ वर्षाच्या कालावधीसाठी खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे:-

**अ)** श्री.शिशुपाल, कक्ष अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल, त्यानंतर ३ वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सूपूर्द करुन ते त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

**ब)** जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

**क)** जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

**ड)** श्री.शिशुपाल यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत-कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा.....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन व तीन ) मधील तरतुदी विचारात घेऊन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आणि सामान्य प्रशासन विभाग **(प्रशि-४)** यांनी श्री.शिशुपाल यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

३. श्री.प्रविण विलास शिशुपाल, कक्ष अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री.प्रविण विलास शिशुपाल, कक्ष अधिकारी यांना प्रतिनियुक्तीवरील नियुक्ती स्वीकारण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने कार्यमुक्त करावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१७१७५०३३८६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.06.17 17:51:45 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.प्रविण विलास शिशुपाल, कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई **(प्रशासकीय विभागामार्फत)**

**प्रत:-**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अ) सह/उप सचिव (आस्थापना), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
ब) सह/उप सचिव **(प्रशि-४)** सामान्य प्रशासन विभाग
यांना विनंती करण्यात येते की, श्री.प्रविण विलास शिशुपाल, कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.
४) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
५) निवड नस्ती/प्रशा-२